# विलक्षण सौदा

पोलंडमधील लोककथा

मराठी : गार्गी लागू



# विलक्षण सौदा

पोलंडमधील लोककथा

लोमडीच्या ( कोल्हा )मालकीची एक सफरचंदाची बाग होती.
आणि सेही ( डुकरासारखा दिसणारा प्राणी ) एका शेताचा मालक होता.

लोमडी सेहीला म्हणाला,"आपण दोघांनी मिळून तुझ्या शेतात काम करू आणि येणारे पिक अर्धे अर्धे वाटून घेऊ. शेत तुझे असल्यामुळे मी माझ्या बागेतील अर्धी सफरचंद तुला देईन"



"ठीक आहे," सेही म्हणाला. "पण एक गोष्ट आपण आधीच ठरवायला हवी ती म्हणजे येणार्या पिकांतील कोणता भाग तू घेणार.... जमिनीच्या वर उगवलेला कि जमिनीच्या खाली उगवलेला...."

"जमिनीच्या वर उगवलेला मी घेईन.." लोमडी म्हणाला.

"बर, मग आपण बटाटे पेरू या.." सेवीने निर्णय घेतला.



दोघांनी मिळून शेताची नांगरणी केली...



नंतर त्यात बटाटे पेरले....



बटाट्याचेया पिकाची कापणी करण्याची वेळ आली. सेही लोमडीला म्हणाला, "पिकाचा जमिनीवरचा भाग तुझा आहे. तो तू कापून घेऊन जा." सेहीने सांगितल्याप्रमाणे लोमडीने केले. बटाट्याच्या पिकाची जमिनीच्या वर उगवलेली निरूपयोगी पाने कापली.



आता सेहीची पाळी.....

त्याने जमिन खोदून छान बटाटे काढून घेतले.

"आता तुझ्या बागेतील सफरचंद काढून बरोबर अर्धी वाटून घेऊ या," सेही म्हणाला.

सेहीला त्याच्या शेतातील सर्व बटाट्याचे पिक मिळाले शिवाय लोमडीच्या बागेतील अर्धी सफरचंद पण मिळाली.

पुढच्यावर्षी सेही आणि लोमडी परत भेटले.

"आपण या वर्षीपण आपले पिक अर्धे वाटून घेऊ या?" लोमडीने सेहीला विचारले.

"हो, आनंदाने!" सेही म्हणाला.

"या वर्षी तू पिकाचा कुठला भाग घेणार? जमिनीखालचा कि जमिनीवरचा?"

"काय, परत मला फसवायला बघतो आहेस? यावेळी मी मूर्खासारखा पिकाचा जमिनीवरचा भाग घेणार नाही. यावर्षी मी पिकाचा जमिनीखालचा भाग घेईन," लोमडी म्हणाला.

"ठीक आहे," सेही म्हणाला. "या वर्षी आपण गहू पेरू या."



दोघांनी मिळून परत शेताची नांगरणी केली.





नंतर त्यांनी शेतात गव्हाची पेरणी केली.

गव्हाच्या उंच वाढलेल्या पिकावर छान भरलेली कणस डोलायला लागली. ती चांगली तयार झाल्यावर सेहीने कापणी केली.



लोमडीने जमिन खणली पण फक्त मुळांशिवाय त्याला काहीच मिळाले नाही.



"चल, आता तुझ्या बागेतील सफरचंद काढून अर्धी अर्धी वाटून घेऊ या," सेही म्हणाला. यावेळीही सेहीला त्याच्या शेतातील पूर्ण गव्हाच पिक आणि लोमडीच्या बागेतली अर्धी सफरचंद मिळाली.



लोमडीच्या लक्षात आल कि परत एकदा त्याची फसवणूक झाली आहे. मदत मागण्यासाठी तो एका मोठ्या न्यायाधिशाकडे गेला.

न्यायाधिशाने सेहीला बोलावून घेतले व त्याला सांगितले, "उद्या तुम्हा दोघांची गव्हाच्या शेतात शर्यत  लावली जाईल. त्यामधे जो जिंकेल त्याला सर्व गव्हाचे पिक व सर्व सफरचंदाचे पिक मिळेल."

लोमडी आणि सेही, दोघांनी मान्य केले.



दुसर्या दिवशी सर्व शेतावर भेटले.
"तुम्ही तयार अहात?" न्यायाधिशांनी विचारले.
न्यायाधिशांनी रेस सुरू करण्यासाठी इशारा केला.
लोमडी सेहीपेक्षा खूपच वेगाने धावत होता. तरीहि इतक्या वेगाने धावून सेही कायम त्याच्या पुढेच.......कारण स्पष्ट होते.

सेहीचे पुष्कळ नातेवाईक होते. ....अगदी सारखे दिसणारे! ते गव्हाच्या शेतात ठिकठिकाणी लपून बसले होते. लोमडी वेगाने धावत येत आहे बघितल्यावर ते धावायला सुरवात करीत.
अगदी शेवटच्या टप्प्यात सेही स्वतः धावला.

लोमडी अर्धे शेतही धाऊन गेला नसेल तर त्याच्या कानावर न्यायाधिशांनी उंच आवाजांत केलेली घोषणा पडली,"हा आहे विजेता...!" आणि तिथे सेही आनंदात ,दम खात, जोराने श्वास घेत उभा होता. यावेळीही सेहीने लोमडीला चांगलच फसविलं होत. यावेळी तर लोमडी सारे गव्हाचे पिक आणि सारी सफरचंद पण गमावून बसला होता.





पुढच्या वर्षी वसंत ऋतुमधे सेहीने परत पिक वाटून घेण्याचा प्रस्ताव मांडला. पण यावेळी लोमडीने साफ नकार दिला.



**समाप्त**